




**महाराष्ट्र शासन**

**क्रमांक: वगृयो-२०२४/प्र.क्र.५१४/योजना-१**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**
३ रा मजला, नवीन प्रशासकीय भवन,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालयासमोर, मुंबई -४०० ०३२.
दिनांक: ०७ मार्च, २०२५

**विषय:- राज्यातील इतर मागास प्रवर्ग, विमुक्त जाती व भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्ग विद्यार्थ्यांसाठी सुरु करण्यात आलेल्या शासकीय वसतिगृहांच्या दुरध्वनी, विज व पाणीपट्टी शुल्क अदा करण्याकरीता निधी वितरण. (सन २०२४-२०२५)**

**वाचा :-** १) इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन निर्णय क्र. वगृयो-२०२०/ प्र.क्र. ०१/योजना-५, दि.२९.११.२०२२
२) इतर मागास बहुजन कल्याण विभाग,शासन निर्णय क्र. वगृयो-२०२०/प्र.क्र.०१/ योजना-५, दि.२८.०२.२०२३
३) इतर मागास बहुजन कल्याण विभाग,शासन निर्णय क्र.वगृयो-२०२२/प्र.क्र.१९/ योजना-५, दि.२३.०२.२०२३
४) इतर मागास बहुजन कल्याण विभाग,शासन निर्णय क्र. वगृयो- २०२०/प्र.क्र.०१/ योजना-५, दि.१९.१२.२०२३
५) इतर मागास बहुजन कल्याण विभाग,शासन परिपत्रक क्र. वगृयो-२०२३/प्र.क्र.१२/ योजना-५, दि.१३.३.२०२३
६) इतर मागास बहुजन कल्याण विभाग,शासन ज्ञापन क्र.वगृयो-२०२३/प्र.क्र.२३/ योजना-५, दि.२८.०४.२०२३
७) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४
८) इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन शुध्दीपत्र क्र.वगृयो-२०२४/ प्र.क्र. ४५३/योजना-१, दि.०८.०८.२०२४
९) संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांचे क्र.२०२५/ इमावबकसं/वसतीगृहनिधीमागणी/२०२४-२५/३१८, दि.२४.०१.२०२५.
१०) इतर मागास बहुजन कल्याण विभाग,शासन ज्ञापन क्र. वगृयो-२०२४/ प्र.क्र. ५१४ /योजना-१, दि.३१.०१.२०२५

**<u>शासन ज्ञापन</u> :-**

संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांना कळविण्याचे मला आदेश आहेत की, राज्यातील इतर मागास प्रवर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्ग या प्रवर्गातील उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी सुरु करण्यात आलेल्या वसतिगृहांचे दुरध्वनी, विज व पाणीपट्टी शुल्क या बाबींसाठी सन २०२४-२०२५ या वर्षाकरीता लेखाशीर्ष "मागणी क्र.झेडजी-३, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्गीय व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०३, मागासवर्गीय यांचे कल्याण,२७७, शिक्षण, (०६) वसतिगृहे, (०६) (०३) मॅट्रीकोत्तर शिक्षण घेणाऱ्या इतर मागास वर्ग, विमुक्त जाती, भटक्या

जमाती व विशेष मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यासाठी भाड्याने वसतिगृह (२२५५ एफ-७०१), ०६, दुरध्वनी, विज व पाणीपट्टी शुल्क" या लेखाशीर्षाखाली रु.२.२५ लक्ष (अक्षरी रु. दोन लक्ष पंचवीस हजार) इतका निधी वितरीत व खर्च करण्यास या ज्ञापनाद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** "२२२५ एफ ७०१" या लेखाशीर्षामधील (०६) वीज बील, पाणी पट्टी व दुरध्वनी शुल्क या उद्दिष्टाखालील निधी वितरीत करण्यासाठी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे हे "नियंत्रक अधिकारी" तसेच संबंधित जिल्हयाचे सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण हे "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून राहतील.

**०३.** संबंधित नियंत्रक अधिकारी यांनी ज्या प्रयोजनार्थ निधीची मागणी केली आहे, त्याच प्रयोजनार्थ खर्च करावा. सदर निधी खर्च झाल्यावर त्याबाबतचे खर्चाचे विवरण (जिल्हानिहाय खर्च) व उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करावेत, वेळेच्या वेळी संबंधिताना वितरीत करण्यात येणाऱ्या रकमेचा वित्त प्रवाह (Cash Flow) बिम्स प्रणालीवर नोंदविण्यात यावा. तसेच, सदर निधी पूर्ण खर्च झाल्याबाबतच्या प्रमाणपत्रासह पुढील निधी मागणीबाबतचा प्रस्ताव संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांनी शासनास सादर करावा.

**०४.** उपरोक्त आर्थिक वर्षातील खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे तपासण्याच्या अधीन राहून निधी खर्च करण्याची जबाबदारी आहरण व संवितरण अधिकाऱ्यांची राहील. तसेच, वित्तीय नियमावली, महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका यानुसार वेळोवेळी वित्त विभागाने निर्गमित केलेल्या अटी व शर्तीनुसार सदर निधी खर्च करून कोणतीही वित्तीय अनियममितता होणार नाही, याची दक्षता घेण्याची जबाबदारी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांची राहील.

**०५.** सदर ज्ञापन हे वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४ अन्वये विभागास प्राप्त अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**०६.** सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक संकेतांक २०२५०३०७१२४०२४४२३४ असा आहे. हे ज्ञापन डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DINESH ROHIDAS CHAVAN

Digitally signed by DINESH ROHIDAS CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=c0edee7a8805e86e41846cf28cf151b9ce48bb88ebf4f2e8a7fc10e8dcad98ec, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C2377ED235498603821D49922A210871FF6FB9B369722AC707AEE7DCD87F2BD, cn=DINESH ROHIDAS CHAVAN
Date: 2025.03.07 12:41:43 +05'30'

**( दि. रो. चव्हाण )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-** संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

**प्रत:-**

१. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ ( लेखा परिक्षा) /(लेखा अनुज्ञेयता ),मुंबई /नागपूर.
२. वित्त विभाग (कार्यासन अर्थ-३), मंत्रालय, मुंबई.
३. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
४. प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण, (सर्व).
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

६. अधिदान व लेंखा अधिकारी, मुंबई.

७. जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे

८. सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, (सर्व)

९. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०. योजना-१,(संग्रहार्थ).